**मुंबई भेटीवर येणाऱ्या मान्यवर अतिथींच्या परिवहन व्यवस्थेकरिता ४ व परभणी जिल्ह्यास भेट देणाऱ्या मान्यवरांच्या परिवहनासाठी १ अशी एकूण ५ वाहने खरेदी करण्यास मंजूरी देण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : डीव्हीसी-१०१८/प्र.क्र.१९३/का.३१**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- १६ मार्च, २०२०

वाचा:- १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक :- वाहन २०१४/प्र.क्र.४३/का.३१, दि.२४.०७.२०१५.
२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक :- वाहन २०१४/प्र.क्र.४३/का.३१, दि.०३.०३.२०२०.
३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक :- डीव्हीसी-१०१५/प्र.क्र.९८/३१, दि.२३.०२.२०१७.

प्रस्तावना:-

सामान्य प्रशासन विभाग (राजशिष्टाचार) या विभागाच्या अधिनस्त असलेल्या शासकीय परिवहन सेवा, मुंबई या कार्यालयामार्फत, मुंबई येथे भेट देणाऱ्या अति-अति महत्वाच्या व्यक्ती, राज्य अतिथी इत्यादी मान्यवरांच्या परिवहन व्यवस्थेसाठी, शासकीय परिवहन सेवा, वरळी, मुंबई या कार्यालयाच्या अधिनस्त डी. व्ही. वाहनांचा ताफा ठेवण्यात येतो.

शासकीय परिवहन सेवेसाठी निर्लेखित केलेल्या वाहनांच्या बदली ३ नवीन वाहने खरेदी करण्याची, परभणी जिल्ह्याकरिता निर्लेखित वाहनाच्या बदली एक नवीन वाहन खरेदी करण्याची तसेच राज्यस्तरीय वाहन आढावा समितीने शासकीय परिवहन सेवा कार्यालयासाठी ५५ वाहनांच्या सुधारित आढाव्यास मंजुरी दिल्याने १ नवीन वाहन अशी ५ वाहने खरेदी करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

त्यानुषंगाने राज्यस्तरीय वाहन धोरण आढावा समितीने दिलेल्या मान्यतेप्रमाणे, शासकीय परिवहन सेवा, मुंबई या कार्यालयासाठी ४ वाहने व परभणी जिल्ह्याकरीता १ वाहन खरेदी करण्याबाबत शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

शासन निर्णय:-

शासकीय परिवहन सेवा, मुंबई या कार्यालयासाठी राज्यस्तरीय वाहन धोरण आढावा समितीने एकूण ५५ वाहनांचा आढावा मंजूर केलेला आहे. त्यापैकी निर्लेखित केलेल्या वाहनाऐवजी वाहन धोरण आढावा समितीने एकूण ३ वाहने व परभणी जिल्ह्याकरिता निर्लेखित वाहनाच्या बदली १ नवीन वाहन व राज्यस्तरीय वाहन आढावा समितीने शासकीय परिवहन सेवा कार्यालयासाठी ५५ वाहनांच्या सुधारित आढाव्यास मंजुरी दिल्याने १ नवीन वाहन अशी ५ नवीन वाहने खरेदी करण्यास मान्यता दिली आहे. त्यास अनुसरून Toyota Kirloskar Motor Pvt.Ltd या कंपनीकडून GeM Portal वर " Innova Crysta G Plus" हे वाहन खरेदी करण्यासाठी रुपये ७१,४७,३६८/- वजा रु.९६,५८७/- ( २% TDS under GST) अशी एकूण रु. ७०,५०,७८१/- (रुपये सत्तर लाख पंन्नास हजार सातशे एक्याऐंशी फक्त) इतकी रक्कम अदा करण्यास शासन मंजुरी देण्यात येत आहे.

२. सदर वाहने खरेदी करण्यास वित्त विभागाच्या राज्यस्तरीय आढावा समितीने मान्यता दिली आहे.

३. हे आदेश वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, शासन निर्णय वित्त विभाग क्र. विअप्र २०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि. १७ एप्रिल, २०१५ मधील भाग पहिला, उपविभाग दोन मधील

अ.क्र. १९-ब नियम क्र. ६९ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. याप्रित्यर्थ होणारा खर्च "मागणी क्र. ए-४, २०५२ सचिवालय सर्वसाधारण सेवा (०९०) सचिवालय (००) (०६) विख्यात अभ्यागतांसाठी वाहन खरेदी -५१ मोटार वाहने सांकेतांक क्रमांक २०५२००८१" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व **सन २०१९-२०** या वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

५. उपरोक्त रक्कम रुपये रु. ७०,५०,७८१/- ( रुपये सत्तर लाख पंन्नास हजार सातशे एक्याऐंशी फक्त) मे. Toyota Kirloskar Motor Pvt.Ltd यांना अदा करण्यात यावी.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ३९९/२०१९/विनियम, दि.०५.११.२०१९, ३९८/२०१९/विनियम, दि.३०.१०.२०१९ व राज्यस्तरीय वाहन आढावा समितीच्या दि.३१.०१.२०२० च्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०२००३१६१७२९४७१७०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Satish Karbhari Jondhale

Digitally signed by Satish Karbhari Jondhale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=GAD Protocol, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=96b5b527d7131539d3b3eb3ba523bb3514dd3d3437a78ac0f73c6d8043215729, cn=Satish Karbhari Jondhale
Date: 2020.03.17 17:31:34 +05'30'

**( सतीश जोंधळे )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई,
३. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, वांद्रे, मुंबई,
४. नियंत्रक, शासकीय परिवहन सेवा, वरळी, मुंबई,
५. जिल्हाधिकारी, परभणी
६. कक्ष अधिकारी,कार्यासन-२५ व ३०, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
७. कक्ष अधिकारी (व्यय-४/विनियम), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
8. M/s Toyota Kirloskar Motor Pvt.Ltd, Plot No.1, Bidadi Industrial Area, Bidadi, Ramanagar Dist, Pin 562 109, Karnataka, India
९. निवडनस्ती/(का.३१).